पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी योजनेंतर्गत ग्रामीण भागातील केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांच्या लाभार्थ्यांना द्यावयाच्या शासकीय जमिनी मुल्यविरहीत उपलब्ध करून देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः पीडीयु-२०१८/प्र.क्र.२५७/योजना-१०**
बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०२ ऑगस्ट, २०१८

वाचा :- **शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्र.प्रआयो-२०१७/प्र.क्र.६०/यो-१०, दि.१४ जुलै, २०१७**

**प्रस्तावना :-**

केंद्र व राज्य शासनाने सन २०२२ पर्यंत ग्रामीण भागातील सर्व बेघर कुटुंबांना घरे उपलब्ध करून देण्याची महत्वकांक्षी मोहिम हाती घेतली आहे. त्या अनुषंगाने राज्यात केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना- ग्रामीण तसेच राज्य पुरस्कृत रमाई आवास योजना, शबरी आवास योजना, आदिम आवास योजना या योजनांतर्गत ग्रामीण भागातील लाभार्थ्यांना घरकुले बांधण्यासाठी अनुदान उपलब्ध करून देण्यात येते. तथापि, या योजनेतील घरकुल पात्र लाभार्थी केवळ जागे अभावी घरकुलाचा लाभ मिळण्यापासून वंचित आहेत. ही बाब विचारात घेऊन, राज्य शासनाने पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजना वरील संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सुरू केली आहे. या योजनेंतर्गत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना- ग्रामीण व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत घरकुल पात्र परंतु, घरकुल बांधकामासाठी जागा उपलब्ध नसलेल्या कुटुंबांना जागा खरेदीसाठी रूपये ५०,०००/- पर्यंत अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्यात येते.

२. पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजनेंतर्गत जागेचे दर प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करून निश्चित करण्याची तरतूद आहे. त्यानुसार या योजनेंतर्गत जागेचे दर हे बाजार मुल्याच्या अनुषंगाने निश्चित करण्यात येतात. त्यामुळे या

योजनेंतर्गत शासकीय जमिनीचे मुल्य बाजार भावानुसार आकारून त्या अनुषंगाने या योजनेंतर्गत लाभार्थ्याला अनुदान देण्यात येते.

३. राज्यातील केंद्र व राज्य पुरस्कृत ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील जागा नसलेल्या लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करून देण्यासाठी या योजनेंतर्गत या लाभार्थ्यांना लाभ देण्यात येतो व यासाठी आवश्यक निधी अर्थसंकल्पित करण्यात येतो. केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांमधील लाभार्थ्यांना शासकीय जमिनीकरिता पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजनेंतर्गत निधी जिल्हाधिकाऱ्यांना उपलब्ध होत आहे व हा निधी शासनाच्या खात्यात जमा होतो. या प्रक्रियेमुळे शासकीय निधी अर्थसंकल्पित होऊन खर्च होऊन पुनःश्च शासकीय खात्यात जमा होत आहे. तसेच, या योजनेंतर्गत उपलब्ध होत असलेला निधी खाजगी जमिन खरेदीसाठी देखील वापरण्यात येत असल्याने पात्र लाभार्थ्यांना खाजगी जमीन खरेदीसाठी निधी कमी प्रमाणात उपलब्ध होत आहे.

४. पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी या योजनेंतर्गत शासकीय जमिनी मुल्यविरहीत उपलब्ध करून देण्याची व या योजनेंतर्गत शासकीय जमिनी सुलभरित्या उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजनेची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे:-

१) राज्यातील ग्रामीण भागातील केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत घरकुल पात्र लाभार्थ्यांना जागे अभावी घरकुलाचा लाभ देण्यासाठी पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजनेंतर्गत शासकीय जमिनी मुल्यविरहीत उपलब्ध करून देणे.

२) राज्यातील ग्रामीण भागातील केंद्र व राज्य पुरस्कृत ग्रामीण घरकुल योजनांतर्गत घरकुल पात्र लाभार्थ्यांचे शासकीय जागेवर अतिक्रमण असल्यास, लाभार्थ्यांना पंडित दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजनेंतर्गत लाभ देय असल्यास अतिक्रमित जागा घरकुल बांधकामासाठी उपयुक्त असल्यास व द्यावयाची असल्यास अशा प्रकरणी शासकीय जमिनी केंद्र व राज्य शासन पुरस्कृत ग्रामीण घरकुल योजनेसाठी शासकीय जागा वाटपासंदर्भातील नियम लागू करणे. अशा प्रकरणी अतिक्रमण नियमानुकूल करण्याचे नियम लागू होणार नाहीत.

३) केंद्र व राज्य पुरस्कृत घरकुल योजनांच्या पात्र लाभार्थ्यांसाठी शासकीय जमिनी उपलब्ध करून देण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून, मिशन मोडवर (Mision mode) त्याची अंमलबजावणी करणे. पंडित दीनदयाळ उपाध्याय यांच्या दिनांक २५ सप्टेंबर या जयंती दिनापर्यंत जास्तीत जास्त लाभार्थ्यांना लाभ देण्यासाठी कार्यक्रम राबविणे.

२. सदर शासन निर्णय, महसूल व वन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१/शिकाना, दिनांक ०५ जुलै, २०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने व मंत्रिमंडळाच्या दिनांक १२ जुलै, २०१८ रोजीच्या बैठकीत मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१८०८०२१३०८३७०८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Surendrakumar Gupta

Digitally signed by Aseem Surendrakumar Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Developement Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Surendrakumar Gupta
Date: 2018.08.02 15:47:03 +05'30'

**(असीम गुप्ता)**
सचिव, ग्राम विकास विभाग

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) सर्व मा.मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षतेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) सर्व विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
६) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

९) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, बेलापूर, नवी मुंबई.
१०) उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व).
११) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा , जिल्हा परिषद, सर्व.
१२) निवड नस्ती (योजना-१०).